**राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ,
नागपूर येथील न्यायाधिकरणावरील पीठासीन
अधिकारी यांच्या नियुक्तीबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण २०२१/प्र.क्र. ८१/विशि-५**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २८ ऑक्टोबर , २०२१

**वाचा :**

१. उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१४/(५१४/१४) / विशि-५. दिनांक २९ ऑगस्ट २०१८

२. उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. युएसजी १३९१/२०८९/ विशि-४, दिनांक १९ ऑगस्ट १९९५

३. महाप्रबंधक, उच्च न्यायालय प्रशासन, मुंबई यांची क्र A.१२१६/८७/१७२८/२०२१ व A. १२१६ /८७/१७७८/ २०२१, अनुक्रमे दिनांक २४ व २७ ऑगष्ट २०२१ रोजीची पत्रे

**प्रस्तावना:-**

राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर येथील विद्यापीठ व महाविद्यालय न्यायाधिकरणावरील रिक्त असलेल्या पीठासीन अधिकारी या पदावर संदर्भ क्र १ अन्वये नियुक्त करण्यात आलेले श्री. अशोक अंबादास भाटकर यांची मुदत दिनांक १७/९/२०२१ रोजी संपुष्टात आली आहे. महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ अधिनियमाच्या कलम ८० नुसार सदर राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ , नागपूर येथील विद्यापीठ व महाविद्यालय न्यायाधिकरणावरील रिक्त असलेल्या पीठासीन अधिकारी या पदावर नवीन पीठासीन अधिकारी यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर येथील रिक्त असलेल्या राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर येथील न्यायाधिकरणावरील पीठासीन अधिकारी या पदावर मा. न्यायमुर्ती श्रीमती स्वप्ना एस. जोशी, उच्च न्यायालय, मुंबई यांची तीन वर्षाच्या कालावधीसाठी, त्यांनी प्रत्यक्ष पद धारण केल्याच्या दिनांकापासून नियुक्ती करण्यात येत आहे. महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील तरतूदी तसेच संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयात नमूद सेवाशर्ती मा. न्यायमुर्ती श्रीमती स्वप्ना एस. जोशी उच्च न्यायालय, मुंबई यांना लागू राहतील.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०२८१६२११९६५०८ असा आहे. सदरहू शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2021.10.28 16:25:22 +05'30'

**(अजित बाविस्कर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन ,मलबार हिल, मुंबई,
२) मा. न्यायमुर्ती श्रीमती स्वप्ना एस. जोशी , उच्च न्यायालय, मुंबई
३) मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) महाप्रबंधक, उच्च न्यायालय प्रशासन, मुंबई ,
५) श्री.एस.ए.कोतवाल, पीठासीन अधिकारी , विद्यापीठ व महाविद्यालय न्यायाधिकरण , औरंगाबाद
६) कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर २. महाराष्ट्र,
८) महालेखापाल (लेखा परीक्षा) नागपूर २, महाराष्ट्र.
९) संचालक, उच्च शिक्षण महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) संचालक, तंत्र शिक्षण महाराष्ट्र राज्य, पुणे,
११) विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, नागपूर / अमरावती,
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
१३) मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१४) मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१५) अवर सचिव (कार्या-४) विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६) निवडनस्ती ( विशि-५)